**अनूसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ अंतर्गत सामुहिक वनहक्काची अंमलबजावणीसाठी ६९ व्यवस्थापकांच्या पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र : वहका-२०१८/ प्र.क्र.६७ /का.१४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ ऑगस्ट, २०२०

**वाचा :-**

१. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.राज्यपा-२०१६/प्र.क्र.१६/का-१६, दि.३ मार्च, २०१६.
२. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.राज्यपा-२०१५/प्र.क्र.८६/का-१६, दि.३ मार्च, २०१६.
३. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१६/प्र.क्र.७१/का-८, दि.१० ऑक्टोबर, २०१६.
४. आदिवासी विकास विभाग,शासन शुध्दीपत्रक क्र.आविवि-२०१६/प्र.क्र.७१/का-८, दि.२१ डिसेंबर, २०१६.
५. मा. राज्यपाल यांचे कार्यालयाचे पत्र क्रमांक : RB/DB/e-१३०१६/ (१०)/ (२०१६) PSMC-७th meeting /Minutes /१७ Feb-२०१७/३०४, दि. १४ मार्च,२०१७ चे पत्र.
६. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१७/प्र.क्र.३४/का-८, दि.०८ जून, २०१७.
७. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-२०१७/प्र.क्र.३४/का-८, दि.२७ ऑक्टोबर, २०१७.
८. आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.वहका- २०१८/प्र.क्र.४३/का-१४, दि. ११ मे, २०१८
९. आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र.पुनर्वि- २०१८/प्र.क्र.४५/कार्या-६, दि. ३१ मार्च, २०१८.
१०. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र: वहका-२०१८/ प्र.क्र.६७ /का.१४, दि. १३ जून, २०१८.
११. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र: वहका-२०१८/ प्र.क्र.६७/का.१४, दि.१ नोव्हेंबर, २०१८.
१२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.: वहाक-२०१८/प्र.क्र.६७/का.१४, दि. ८ एप्रिल, २०१९.
१३. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.: वहाक-२०१८/प्र.क्र.६७/का.१४, दि. ११ डिसेंबर, २०१९.
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे क्र. आसंप्रसं-२०१९/ वहका/ प्र.क्र.९/का.४/८४४, दि. १६ मार्च, २०२० रोजीचा प्रस्ताव.
१५.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र. आसंप्रसं-२०२०/ वहका/ प्र.क्र.१७७/का.४/९३८, दि. ७ एप्रिल, २०२०.

**प्रस्तावना**:

मा.राज्यपाल यांच्या कार्यालयात केंद्र शासनाच्या आदिवासी विकास मंत्रालयाने दिलेल्या सुचनेस अनुसरुन, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ३१.१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी कक्षाची स्थापना करण्यात आली. सदर आदिवासी कक्षामार्फत करावयाची कार्यवाही तसेच या कक्षामार्फत राबविण्यात येणाऱ्या पथदर्शी प्रकल्पाबाबत मार्गदर्शक तत्वे आदिवासी विकास विभागाच्या दि.५.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आली असून मा. सचिव (आ.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समिती गठीत केली आहे. सदर पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीची ७ वी बैठक दि.१७ फेब्रुवारी, २०१७ रोजी आयोजित करण्यात आली. सदर बैठकीमध्ये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वनहक्काच्या अंमलबजावणीसाठी १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त,

आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणूकांना वेळोवळी मुदतवाढ देण्यात आलेली आहे. अलिकडेच संदर्भ क्र. १३ अन्वये दि. १ ऑक्टोबर, २०१९ ते दि. ३१ जानेवारी, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदरील व्यवस्थापकांच्या सेवेची आवश्यकता विचारात घेऊन कोरोना विषाणू प्रतिबंधक उपाययोजनांतर्गत देशात संचारबंदी लागू असल्याने संदर्भ क्र. १५ अन्वये आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी दि. ०१ फेब्रुवारी, २०२० ते दि. ३० एप्रिल, २०२० या कालावधीसाठी शासन मान्यतेच्या अधीनतेने मुदतवाढ दिलेली आहे. सदरील बाब विचारात घेता, उक्त ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकांना दि. ०१ फेब्रुवारी, २०२० ते दि. ३१ ऑक्टोबर, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीच्या दि.१७ फेब्रुवारी, २०१७ रोजी पार पडलेल्या ७ व्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाप्रमाणे १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकांची मुदतवाढ दिनांक ३१ जानेवारी, २०२० अखेर संपुष्टात आली आहे. त्यामुळे संदर्भ क्र. १५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार दि. ०१ फेब्रुवारी, २०२० ते दि. ३० एप्रिल, २०२० या कालावधीसाठी कार्योत्तर मंजूरी देण्यात येत असून दि. दि. ०१ मे, २०२० ते दि. ३१ ऑक्टोबर, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत योजनेचे स्वरुप, भरती, निवडपध्दती इ. बाबतची कार्यपध्दती तसेच अटी व शर्ती संदर्भ क्र. २ अन्वये विहीत केल्यानुसार जशाच्या तशा लागू राहतील. याशिवाय उक्त संदर्भ क्र. २ अन्वये विहीत केलेली व्यवस्थापक यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्यांव्यतिरक्त सामुहिक वनहक्क मिळालेल्या गावांचा सामुहिक व्यवस्थापन विकास आराखडे तयार करण्याची प्रक्रिया राबविण्यास मदत करणे, मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. २८ फेब्रुवारी, २०१९ रोजी दिलेल्या आदेशानुसार जिल्हास्तरीय वनहक्क समितीने अमान्य केलेले दावे / अपिले यांचे पुनर्विलोकन करणे, ऑनलाईन पोर्टलवर सामुहिक व वैयक्तिक दाव्यांची डेटा एन्ट्री करणे, मंजूर वनपट्टेधारकांना शासनाच्या विविध योजनांचा लाभ देणेबाबतचे कामकाज हाताळणे, कौशल्य विकास अंतर्गत विविध योजना राबविणे याप्रमाणे कामकाज करणे आवश्यक राहील.

३. संबधित जिल्हाधिकारी यांनी सर्व व्यवस्थापकांच्या कामकाजाचा मासिक आढावा घ्यावा. तसेच आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे यांनी "नोडल अधिकारी" म्हणून व्यवस्थापकांच्या कामाचे एकत्रित मुल्यमापन करावे आणि संबंधित व्यवस्थापक यांच्या सेवा सुरु ठेवाव्यात किंवा कसे, याबाबत निर्णय घ्यावा.

३. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारित नियम २०१२ च्या अंतर्गत सामुहिक वनहक्काच्या अंमलबजावणीसाठी १६ जिल्हयातील ९ जिल्हा व्यवस्थापक व ६१ तालुक्यांसाठी ५५ तालुका व्यवस्थापक तसेच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक आणि अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग नाशिक,ठाणे अमरावती व नागपूर येथील प्रत्येकी १ व्यवस्थापक या प्रमाणे ५ असे एकूण ६९ व्यवस्थापकांच्या नेमणुकीसाठी दि. ०१ फेब्रुवारी, २०२० ते दि. ३१ ऑक्टोबर, २०२० पर्यंत होणारा खर्च "मागणी क्र.टि-

५-२२२५ अनुसूचित जाती, जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण पंचावार्षिक योजनेंतर्गत योजना, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण-७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना-राज्य योजना अंतर्गत योजना (०१) (५३) आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी क्षेत्रामध्ये प्रकल्पाची अंमलबजावणी मागणी क्र.टी-५ (२२२५-डी-३६९) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षातंर्गत आयुक्त, संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०२००८०३११३८१५०३२४** क्रमांक असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.08.13 14:47:53 +05'30'

**( ल.गो. ढोके )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई-३५.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
३. महालेखापाल लेखापरिक्षा (लेखा व अुनज्ञेयता) ,महाराष्ट्र-१ मुंबई .
४. महालेखापाल लेखापरिक्षा (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,(वने) मंत्रालय,मुंबई.
७. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान मुख्य वन संरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
९. आयुक्त, आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. जिल्हाधिकारी, नंदुरबार,धुळे,जळगांव,अहमदनगर,पुणे,अमरावती,नांदेड,गोंदिया,
१२. नागपूर, पालघर, नाशिक,यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक,नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे,अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर.
१५. तहसिलदार, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक, नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे, अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर. सहाय्यक आयुक्त (लेखा), आदिवासी विकास विभाग, नाशिक,ठाणे,अमरावती, नागपूर.
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर, रायगड, नाशिक,नंदुरबार, धुळे, जळगांव, अहमदनगर, पुणे,अमरावती, नांदेड, गोंदिया, नागपूर, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर.
१८. अवर सचिव (का-६) कक्ष अधिकारी (का.८), आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
१९.निवड नस्ती (कार्यासन-१४).